प्रधानमंत्री जन आरोग्य योजना महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेसह राज्यामध्ये सुरू करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६**
जी.टी. रुग्णालय आवार, १० मजला
मंत्रालय, मुंबई -०१
दिनांक: २१ सप्टेंबर, २०१८

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र. रागांयो-२०१०/प्र.क्र.२४०/आरोग्य-६, दि. ३१ मे, २०११
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०१६/प्र.क्र.३३१/आरोग्य-६, दि. १२ ऑगस्ट, २०१६
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रागांयो-२०१६/प्र.क्र.२०३/आरोग्य-६, दि.१६ सप्टेंबर, २०१६
४) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र. रागांयो-२०१६/प्र.क्र.६४/आरोग्य -६, दि. १३ एप्रिल, २०१७
५) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र. रागांयो-२०१६/प्र.क्र.६४/आरोग्य -६, दि. ३० जुन, २०१७
६) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र. मफुयो-२०१७/प्र.क्र.२३९/आरोग्य-६,दि.१७ जानेवारी,२०१८
७) मा. केंद्रीय मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुंटुंब कल्याण,भारत सरकार, नवी दिल्ली यांचे दि.१३ सप्टेंबर, २०१८ चे पत्र
८) राज्य आरोग्य हमी सोसायटीचे पत्र क्र. राआहसो/कक्ष-१/टे-१/५५२७/प्रजआयो/१००८/२०१८, दिनांक १५ सप्टेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना पहिल्या टप्प्यात आठ जिल्हयांत (मुंबई शहर, मुंबई उपनगर, रायगड, धुळे, नांदेड, अमरावती, सोलापूर,गडचिरोली) दि. २ जुलै,२०१२ रोजीपासून लागू करण्यात आली तर दि.२१ नोव्हेंबर,२०१३ पासून संपुर्ण राज्यात ही योजना अंमलात आली आहे. ही योजना नॅशनल इन्श्युरन्स कंपनीच्या सहभागाने राबविण्यात येत आहे. संदर्भाधिन क्र. ४ येथील दि.१३ एप्रिल,२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना दि.१ एप्रिल,२०१७ पासून महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना या नावाने सुरु ठेवण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत राज्यातील दारिद्रय रेषेखालील पिवळी, अंत्योदय अन्न योजना, अन्नपूर्णा योजना शिधापत्रिकाधारक कुटुंबे आणि दारिद्रयरेषेवरील (रु.१ लक्षापर्यंत वार्षिक उत्पन्न असलेल्या) केशरी शिधापत्रिकाधारक कुटुंबे व शेतकरी आत्महत्याग्रस्त् १४ जिल्हयातील शुभ्र शिधापत्रिकाधारक शेतकरी कुटुंबांना महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेंतर्गत विमा संरक्षणाव्दारे वैद्यकीय सेवा पुरविण्यात येतात. सध्या या योजनेंतर्गत ३० निवडक विशेष सेवांतर्गत ९७१ प्रकारचे गंभीर व अधिक खर्चिक उपचार व १२१ शस्त्रक्रिया पश्चात सेवांचा (फॉलोअप) समावेश असून लाभार्थी रुग्णांना ४८४ अंगीकृत शासकीय व खाजगी रुग्णालयामधून रोख रक्कमरहित (कॅशलेस) या वैद्यकीय सेवा उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. १३१ प्रोसिजर्स केवळ शासकीय रुग्णालयांसाठी आरक्षित आहेत.सदर योजना पूर्णत: संगणकीकृत असून लाभार्थ्यास वैध शिधापत्रिका (पिवळी, अंत्योदय, अन्नपूर्णा व केशरी) व फोटो ओळखपत्राच्या आधारे अंगीकृत रुग्णालयांमधून उपचार अनुज्ञेय आहेत. योजनेंतर्गत वार्षिक विमा संरक्षण रक्कम प्रति वर्ष/

प्रति कुटुंब रु. १.५० लक्ष एवढया मर्यादेपर्यंत मोफत उपचार अनुज्ञेय असून मुत्रपिंड प्रत्यारोपणासाठी सदर मर्यादा रु. २.५० लक्ष एवढी आहे.लाभार्थी कुटुंबांच्या विमा संरक्षणासाठी शासन नॅशनल इन्श्युरन्स कंपनीस विमा हप्ता अदा करीत आहे. महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना अंमलात येईपर्यंत किंवा एक वर्ष ( दिनांक ०१.०१.२०१८ ते दिनांक ३१.१२.२०१८) यापैकी जे आधी होईल त्या कालावधीपर्यंत विद्यमान महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेस संदर्भाधीन क्र. ६ येथील दिनांक १७.०१.२०१८ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली आहे. तसेच सदर मुदतवाढीच्या कालावधीत योजनेच्या सर्व लाभार्थी घटकांसाठी प्रतिकुटूंब प्रतिवर्ष रु.६९०/- (जीएसटी रहीत) या सुधारीत दराने विमाहप्ता विमा कंपनीस अदा करण्यास संदर्भाधीन क्र. ६ येथील दिनांक १७.०१.२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर मुदतवाढ माहे डिसेंबर २०१८ अखेर संपुष्टात येत आहे.

**२.** केंद्र शासनाने आयुष्यमान भारत कार्यक्रम देशभरात राबविण्याचा निर्णय दिनांक २१ मार्च,२०१८ रोजीच्या केंद्रीय मंत्रिमंडळाच्या बैठकीत घेतला आहे. आयुष्यमान भारत अंतर्गत प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (PMJAY) ही योजना राबविण्यात येणार आहे. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (PMJAY) मा. पंतप्रधान महोदयांची अत्यंत महत्त्वाकांक्षी योजना आहे. या योजनेंतर्गत सामाजिक, आर्थिक व जातीय जनगणनेमधील (SECC data) देशातील १० कोटी कुटुंबाना प्रति कुटुंब प्रति वर्ष रुपये ५.०० लक्षापर्यंत १३४९ सर्जिकल व मेडिकल उपचाराच्या माध्यमातून मान्यताप्राप्त खाजगी व शासकीय रुग्णालयामार्फत सेवा मिळणार आहे. त्यात राज्यातील ८३.७२ लक्ष कुटुंबांचा समावेश असून यामध्ये शहरी भागातील २४.८१ लक्ष व ग्रामीण भागातील ५८.९१ लक्ष कुटुंबे आहेत. या योजनेंतर्गत केंद्र शासनाचा हिस्सा ६० टक्के व राज्य शासनाचा हिस्सा ४० टक्के राहील.

**३.** मा. केंद्रीय मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुंटुंब कल्याण, नवी दिल्ली यांच्या संदर्भाधिन क्र.७ येथील दि.१३ सप्टेंबर, २०१८ च्या पत्रान्वये प्रधानमंत्री जन आरोग्य योजना दिनांक २३ सप्टेंबर, २०१८ पासुन राज्यामध्ये लागू करण्याबाबत सुचित केले आहे. केंद्र शासनाची प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व राज्याची महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना या दोन्ही योजना एकत्रितपणे राबवाव्या की स्वतंत्रपणे याबाबतचा निर्णय घेणे आवश्यक आहे. त्यानुसार योजना *विमा (Insurance)* **किंवा** *ॲश्युरन्स (Assurancec)* **किंवा** संयुक्त*(Hybrid)* तत्त्वावर राबविण्याबाबतचा निर्णय घेऊन त्यास मा. मंत्रीमंडळाची मान्यता घेणे, विमा कंपनी निवड करण्याकरिता निविदा प्रक्रिया राबविणे, निविदा प्रक्रियेच्या अनुषंगाने केंद्र शासनाची मान्यता घेणे, अंमलबजावणी सहाय्य संस्थांची (Implementation Support Agency - ISA) निवड करणे, निविदेअंती पात्र संस्थांची निवड करुन योजना लागू करण्याकरण्यासाठी आवश्यक कार्यवाही करणे इ. बाबी कराव्या लागणार आहेत. सदर प्रक्रिया पुर्ण होऊन प्रत्यक्ष योजना लागू होण्यास काही अवधी लागणार आहे. सबब, सद्यस्थितीत, प्रधानमंत्री जन आरोग्य योजना दिनांक २३ सप्टेंबर, २०१८ पासुन पहिल्या टप्प्यामध्ये राज्यातील शासकीय रुग्णालयामध्ये राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रधानमंत्री जन आरोग्य योजना दिनांक २३ सप्टेंबर, २०१८ पासुन पहिल्या टप्प्यामध्ये पुढील तीन महिन्याकरिता (दिनांक ३१ डिसेंबर, २०१८ पर्यंत) राज्यातील शासकीय रुग्णालयामध्ये राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना राज्य आरोग्य हमी सोसायटीकडून Insurance व Assurance mode नुसार पुढीलप्रमाणे राबविण्यात येईल.

**अ) विमा संरक्षण** - केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेंतर्गत वार्षिक रु.५.०० लक्षापर्यंत विमा संरक्षण अनुज्ञेय असल्याने, राज्यातील रु. ८३.७२ लक्ष लाभार्थ्यांना सध्याच्या विमा कंपनीमार्फत रु.१.५० लक्षापर्यंतचे आरोग्य विमा संरक्षण विमा तत्त्वावर व रु.१.५० लक्षावरील ते रु.५.०० लक्षापर्यंतचे विमा संरक्षण राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत ॲश्युरन्स तत्त्वावर उपलब्ध करुन देण्यात येईल.

**आ) अंगीकृत रुग्णालये** - महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेमध्ये अंगीकृत असलेल्या रुग्णालयांपैकी सुरुवातीला ८० शासकीय रुग्णालयांमध्ये प्रधानमंत्री जन आरोग्य योजना सुरु करण्यात येईल.रूग्णालयाचे अंगीकरण धोरण तयार करुन त्यानुसार खाजगी रुग्णालये अंगीकृत करण्यात येतील.

**इ) समाविष्ट उपचार** - केंद्र शासनाने प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेंतर्गत १३४९ उपचार निश्चित केले आहेत तर महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेमध्ये ९७१ उपचार समाविष्ट आहेत. दोन्ही योजनांतील २३२० उपचारांचा आढावा घेऊन १६३२ उपचारांची एकत्रित यादी तयार करण्यात आली. सदर यादीची **प्राथमिक छाननी** केली असता, त्यामध्ये ५८१ उपचार दोन्ही योजनांत समाविष्ट आहेत (**परिशिष्ट अ**), तर प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेतील ६६१ उपचारांचा महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेत समावेश नाही (**परिशिष्ट ब**). महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेतील ९७१ उपचारांपैकी समान उपचारांव्यतिरिक्त प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेशी न जुळणारे ३९० उपचार आहेत. उपचारांची प्राथमिक छाननी करण्यात आलेली असून संचालक,आरोग्य सेवा यांच्यामार्फत अंतिम करण्याची प्रक्रिया चालू आहे.संचालक, आरोग्य सेवा यांनी प्रमाणित केलेली उपचारांची यादी अंतिम राहील.

**ई)** प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेंतर्गत पुढीलप्रमाणे लाभार्थ्यांना लाभ अनुज्ञेय राहतील.

| विवरण | उपचारांची संख्या | लाभ देण्याची कार्यपध्दती |
|---|---|---|
| महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना व प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या दोन्ही योजनांत समाविष्ट उपचार (समान) | ५८१ | विमा तत्त्वावर |
| प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेत समाविष्ट मात्र महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेत समावेश नाही. (असमान) | ६६१ | ॲश्युरन्स तत्त्वावर |

प्रधानमंत्री जन आरोग्य योजना अंतर्गत समावेश असलेल्या सामाजिक आर्थिक व जाती जनगणनेमधील/सर्वेक्षण ( SECC DATA )लाभार्थ्यांना प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेमध्ये समाविष्ट नसलेल्या व महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेमध्ये समाविष्ट असलेल्या उपचार पध्दतीं याप्रमाणे सुमारे १५०० पेक्षा अधिक उपचारांचा लाभ उपलब्ध होणार आहे.

**उ) दावे प्रदान करण्याची कार्यपध्दती -** महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना व प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या दोन्ही योजनांतील लाभार्थ्यांच्या शस्त्रक्रिया/उपचारांचे रु.१.५ लक्षापर्यंतचे दावे विमा कंपनीमार्फत प्रचलित पध्दतीनुसार अंगीकृत रुग्णालयांना अदा करण्यात येतील तर रु.१.५० लक्षावरील ते रु.५.०० लक्षापर्यंत दावे ॲश्युरन्स तत्त्वावर राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत सबंधित अंगीकृत रुग्णालयाना प्रदान करण्यात येतील. प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेमधील SECC अंतर्गत नोंदणी झालेले पंरतु महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेमधील शिधापत्रिकाधारक नसलेल्या लाभार्थ्यांचे रु.५.०० लक्षापर्यंतच्या विमा संरक्षणाचे सर्व दावे Assurance Mode मार्फत राज्य आरोग्य हमी सोसायटीकडून प्रदान करण्यात येतील.

**ऊ)** ॲश्युरन्स तत्त्वावरील दाव्यांवर प्रकिया करण्याकरिता महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेंतर्गत सध्या कार्यरत असलेल्या तृतीय पक्ष प्रशासक कंपन्यांचे सहाय्य घेण्यात येईल.

**३.** प्रधानमंत्री जन आरोग्य योजना राज्यामध्ये राबविण्यासाठी राज्य आरोग्य हमी सोसायटीकडुन खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**१)** प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेतील लाभार्थ्यांना रु.१.५० लक्षापर्यंतचे विमा संरक्षण विमा कंपनीकडून उपलब्ध करुन देण्यासाठी नॅशनल इन्श्युरन्स कंपनी व राज्य आरोग्य हमी सोसायटी यामध्ये असलेल्या सांमजस्य करारात आवश्यक तरतुदी समाविष्ट करुन अनुषंगीक सुधारणा/बदल करणे.

**२)** प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेतील लाभार्थ्यांना विमा तत्त्वावर लाभ उपलब्ध करुन देण्यासाठी विमा कंपनी व तृतीय पक्ष प्रशासक कंपन्यांमध्ये यांमध्ये झालेल्या सांमजस्य करारात देखील आवश्यक बदल/सुधारणा करणे. रु.१.५० लाखावरील ते रु.५.०० लक्षापर्यंतच्या अंगीकृत रुग्णालयांच्या दाव्यांची तपासणी तृतीय पक्ष प्रशासक कंपन्यांकडून करणे.

**३)** एकूण ८० अंगीकृत शासकीय रुग्णालयांशी (Government Network Hospitals) विमा कंपनी व तृतीय प्रशासक कंपन्यांनी केलेल्या कराररनाम्यात आवश्यक बदल करणे. विमा तत्त्वावर प्रदान न करण्यात येणाऱ्या उपचारांचा लाभ लाभार्थ्यांना देण्याकरिता व रु.१.५० लक्ष ते रु.५.०० लक्षापर्यंतचे उपचार लाभार्थ्यांना अंगीकृत रुग्णालयांमधून उपलब्ध करुन देण्याची तरतुद करणे.

**४)** महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेची सध्याची संगणक प्रणाली कायम ठेवून त्यात BIS (Beneficiary Identify System) चा समावेश, Payment Gateway मधील बदल, Preauth & Claims workflow तसेच प्रस्तावित अतिरिक्त उपचार यांचे मॉडयुल संलग्न करणे.

५) महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेतील जे उपचार प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेतील उपचारांशी जुळतात अशा उपचारांचे दावे महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेतील दरांनुसार दोन्ही योजनेतील लाभार्थ्यांच्या शस्त्रक्रिया/उपचारांपोटी अंगीकृत रुग्णालयांना विमा कंपनीकडून मंजुर करणे. उर्वरीत न जुळणाऱ्या उपचारांचे दावे प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेतील दरांनुसार अंगीकृत रुग्णालयांना ॲश्युरन्स तत्त्वावर राज्य आरोग्य हमी सोसायटीकडून मंजूर करणे.

६) केंद्र शासनाच्या सुचनांनुसार, स्टेट बँक ऑफ इंडीयामध्ये Escrow खाते व सदर योजनेकरिता एक स्वतंत्र बचत खाते उघडणे.

४. **नियामक परिषद समिती** :- महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीच्या धोरणात्मक बाबींवर निर्णय घेण्याकरिता मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधिन क्र. २ येथील शासन निर्णय दिनांक १२ ऑगस्ट, २०१६ नुसार नियामक परिषद गठीत करण्यात आली आहे. सदर समितीची पुर्नरचना करून प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना या दोन्ही योजनांकरिता पुढीलप्रमाणे नियामक परिषद गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव/पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | उपाध्यक्ष |
| ३ | अपर मुख्य सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव, नगरविकास विभाग | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव (कामगार),उद्योग उर्जा व कामगार विभाग | सदस्य |
| ८ | प्रधान सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | सदस्य |
| ९ | प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ८ | आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई | सदस्य |
| ९ | मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई | सदस्य सचिव |
| १० | संचालक,आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ११ | संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई | सदस्य |
| १२ | राष्ट्रीय आरोग्य अभिकरणाचे प्रतिनिधी | सदस्य |

५. आरोग्य विमा योजनेत उपचारांस नकार देणे किंवा कमी दर्जाच्या सेवा देणे या अनियमिततेच्या बाबतीत प्रधानमंत्री जन आरोग्य योजना व महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेंतर्गत अंगीकृत रुग्णालये यावर पॅकेज रकमेच्या पाचपट दंड आकारण्यास व लाभार्थ्याने खर्च केलेली रक्कम/ लाभार्थ्याकडून घेण्यात आलेली रक्कम (एक भाग) त्यास परत करण्यात येऊन उर्वरीत चार भागाची रक्कम सोसायटीच्या प्रशासकीय खात्यात वर्ग करण्याची तरतूद करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सबंधित अंगीकृत रुग्णालयाकडून वसुली न झाल्यास, रुग्णालयाचे दावे प्रदान न करणे, रुग्णालयास निलंबित करणे, रुग्णालयाचे अंगीकरण रद्द करणे

याबरोबरच कायदेशीर कारवाई राज्य आरोग्य हमी सोसायटीकडून करण्यात यावी.

६. **करारनामा** (MOU) **:-** प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने, राज्य आरोग्य हमी सोसायटी, नॅशनल इन्श्युरन्स कंपनी, तृतीय पक्ष प्रशासक कंपन्या व टाटा कन्सल्टंसी सर्व्हीसेस या सर्व पक्षकारांमध्ये करारनामा **(परिशिष्ट क)** करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. **वित्तीय भार :-** प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (PMJAY) योजनेंतर्गत राज्यातील ८३.७२ लक्ष कुटुंबांचा समावेश असून यामध्ये शहरी भागातील २४.८१ लक्ष व ग्रामीण भागातील ५८.९१ लक्ष कुटुंबे आहेत. या योजनेंतर्गत केंद्र शासनाचा हिस्सा ६० टक्के व राज्य शासनाचा हिस्सा ४० टक्के राहील. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी आवश्यक तरतूद शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येईल.

८. महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना व प्रधानमंत्री जन आरोग्य योजना विमा कंपनीने खंडीत केल्यास, पुढील निविदा प्रक्रिया पार पडून विमा कंपनीची निवड होईपर्यंत तात्पुरत्या स्वरुपात तृतीय पक्ष प्रशासक कंपन्या व अंगीकृत रुग्णालये यांच्या सहाय्याने ॲश्युरन्स मोडवर योजना अखंडीत राबविण्याचा निर्णय घेण्याचे अधिकार संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक १६ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या विमा कंपनी निवड समितीस राहतील.

९. योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाशी संपर्क करणे, केंद्र शासनाच्या सूचनांचे अनुपालन करणे, योजना सक्षमपणे राबविण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करण्याचे अधिकार व Procedure संबधात किरकोळ बदल करण्याचे अधिकार प्रधान सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग यांना राहतील.

१०. सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१२१/२०१८/कार्या.-१४७२, दि. १८.०९.२०१८ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ३११/२०१८/व्यय-१३, दि. २१.०९.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२११७१६०९०७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Nivruti Gadge

Digitally signed by Subhash Nivruti Gadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b1f74930407346db2703eca69fb25a73a3ba8647d94e4c83579e877eeaa6372e, serialNumber=8aa1f531272224e355732cc20c64b2a014c4d982a276b8f3e7048995acbf1651, cn=Subhash Nivruti Gadge
Date: 2018.09.29 13:35:24 +05'30'

(सु.नि.गाडगे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री, आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

६) मा.राज्यमंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, विधानभवन, मुंबई- २१
८) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
११) विभागीय आयुक्त (सर्व)
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी,नॅशनल हेल्थ एजन्सी,भारत सरकार, नवी दिल्ली
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी,वरळी, मुंबई
१४) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान
१५) उप महासंचालक, आधार (यु.आय.डी), टेलिफॉन एक्चेंज बिल्डींग, कफ परेड, मुंबई
१६) अतिरीक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
१७) जिल्हाधिकारी /आयुक्त, महानगरपालीका(सर्व)
१८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद (सर्व)
१९) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
२०) संचालक, वैद्यकिय शिक्षण विभाग, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
२१) संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
२२) जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)
२३) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
२४) नियंत्रक, शिधावाटप, मुंबई
२५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
२६) सहसंचालक/ उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)
२७) जिल्हा पुरवठा अधिकारी, (सर्व)
२८) जिल्हा माहिती अधिकारी (सर्व)
२९) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकिय महाविद्यालये व रुग्णालये (सर्व)
३०) सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३१) सर्व कार्यासने , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३२) नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई
३३) वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१३/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
३४) भारतीय जनता पक्ष , महाराष्ट्र प्रदेश वसंतराव भगवान चौक, नरीमन पाईंट , मुंबई-२०
३५) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर मुंबई- २८
३६) इंडीयन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय)समिती टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई
३७) राष्ट्रवादी कॉग्रेस पक्ष, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पाईंट मुंबई- २१
३८) बहुजन समाज पक्ष, डी-१ इन्सा हठमेंट, आझाद मैदान, मुंबई ४०० ००१
३९) भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई -०४
४०) भारतीय कम्युनिस्ट पक्ष, मार्क्सवादी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई -१३
४१) निवड नस्ती.

# परिशिष्ट – अ

## महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना व प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या दोन्ही योजनांत समाविष्ट असलेल्या ५८१ समान उपचार पध्दती- विमा तत्त्वावर

| | PMJAY Procedures | | | MJPJAY Procedures | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **Sr No** | **Specialty** | **Name of procedure** | **Package** | **Specialty** | **Matching Procedure** | **Procedures Code** | **MJPJAY Package rate** |
| 1 | Cardiology | Balloon Atrial Septostomy | 18,000 | Cardiology | Balloon Atrial Septostomy | S7F2.2 | 30000 |
| 2 | Cardiology | Balloon Aortic Valvotomy | 25,000 | Cardiology | Balloon Valvotomy | S7F2.1 | 20000 |
| 3 | Cardiology | Balloon Mitral Valvotomy | 27,500 | Cardiology | Balloon Valvotomy | S7F2.1 | 20000 |
| 4 | Cardiology | Balloon Pulmonary Valvotomy | 25,000 | Cardiology | Balloon Valvotomy | S7F2.1 | 20000 |
| 5 | Cardiology | Vertebral Angioplasty with single stent (medicated) | 50,000 | Cardiology | Vertebral Angioplasty | S7F5.3 | 75000 |
| 6 | Cardiology | Vertebral Angioplasty with double stent(medicated) | 65,000 | Cardiology | Vertebral Angioplasty | S7F5.3 | 75000 |
| 7 | Cardiology | Carotid angioplasty with stent (medicated) | 1,30,000 | Interventional Radiology | Carotid Stenting Single Stent With Protection Device | M15W1.30 | 150000 |
| 8 | Cardiology | Renal Angioplasty with single stent (medicated) | 50,000 | Cardiology | Renal Angioplasty | S7F5.1 | 60000 |
| 9 | Cardiology | Renal Angioplasty with double stent (medicated) | 65,000 | Cardiology | Renal Angioplasty | S7F5.1 | 60000 |
| 10 | Cardiology | Peripheral Angioplasty with balloon | 60,000 | Cardiology | Peripheral Angioplasty | S7F5.2 | 60000 |
| 11 | Cardiology | Peripheral Angioplasty with stent (medicated) | 50,000 | Cardiology | Peripheral Angioplasty | S7F5.2 | 60000 |
| 12 | Cardiology | Medical treatment of Acute MI with Thrombolysis/Stuck Valve Thrombolysis | 10,000 | Cardiology | Thrombolytic Therapy for Acute MI | M7T1.11 | **15000** |
| 13 | Cardiology | ASD Device Closure | 80,000 | Cardiology | ASD Device Closure | S7F1.3 | 80000 |
| 14 | Cardiology | VSD Device Closure | 80,000 | Cardiology | VSD Device Closure | S7F1.4 | 80000 |
| 15 | Cardiology | PDA Device Closure | 40,000 | Cardiology | PDA Device Closure | S7F1.6 | 60000 |
| 16 | Cardiology | PDA Coil (one) insertion | 20,000 | Cardiology | Coil Closure Single Coil | S7F1.7 | 20000 |
| 17 | Cardiology | PDA stenting | 40,000 | Cardiology | PDA Stenting | S7F1.5 | 65000 |
| 18 | Cardiology | Pericardiocentesis | 4,000 | Cardiology | Pericardiocentesis | S7F10.2 | 2000 |
| 19 | Cardiology | Temporary Pacemaker implantation | 5,000 | Cardiology | Temporary Pacemaker Implantation | M7F3.2 | 10000 |
| 20 | Cardiology | Permanent pacemaker implantation (only VVI) including Pacemaker value/pulse generator replacement (DOUBLE CHAMBER) | 60,000 | Cardiology | Permanent Pacemaker Implantation | M7F3.1 | 75000 |
| 21 | Cardiology | Permanent pacemaker implantation (only VVI) including Pacemaker value/pulse generator replacement (SINGLE CHAMBER) | 50,000 | Cardiology | Permanent Pacemaker Implantation | M7F3.1 | 75000 |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 22 | Cardiology | PTCA - single stent (medicated, inclusive of diagnostic angiogram) | 65,000 | Cardiology | Coronary Ballon Angioplasty | M7F1.1 | 60000 |
| 23 | Cardiology | Thrombolysis for peripheral ischemia | 10,000 | Interventional Radiology | Intra-Arterial Thrombolysis For Acute Ischemic Limbs | M15W1.18 | 60000 |
| 24 | Cardiology | Bronchial artery Embolisation (for Haemoptysis) | 25,000 | Interventional Radiology | Bronchial Artery Embolization In Hemoptysis Using PVA And Micro Catheter | M15W1.11 | 60000 |
| 25 | Cardiology | Embolization - Arteriovenous Malformation (AVM) in the Limbs | 40,000 | Interventional Radiology | Embolization Of AV Malformation Of Peripheral Extremity, Craniofascial And Visceral Per Sitting | M15W1.34 | 90000 |
| 26 | Cardiology | Catheter directed Thrombolysis for: Deep vein thrombosis (DVT), Mesenteric Thrombosis & Peripheral vessels | 50,000 | Interventional Radiology | Deep vein Thrombolysis for DVT with IVC Filter | M15W1.6 | 125000 |
| 27 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Coronary artery bypass grafting (CABG) | 90,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CABG Off Pump Without IABP, CABG On Pump Without IABP | S7F6.2 | 100000 |
| 28 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Coronary artery bypass grafting (CABG) with Intra-aortic balloon pump (IABP) | 1,10,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Coronary Bypass Surgery Off Pump With IABP, Coronary Bypass Surgery On Pump With IABP | S7F6.6 | 125000 |
| 29 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Coronary artery bypass grafting (CABG) with LV Aneurysmal repair | 1,00,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | CABG With Aneurysmal Repair | S7F6.3 | 110000 |
| 30 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Open Mitral Valvotomy | 75,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Open Mitral Valvotomy | S7F17.4 | 80000 |
| 31 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Closed Mitral Valvotomy | 30,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Closed Mitral Valvotomy | S7F17.3 | 20000 |
| 32 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Open Pulmonary Valvotomy | 75,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Open Pulmonary Valvotomy | S7F17.2 | 75000 |
| 33 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Mitral Valve Repair | 80,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Repair Without Prosthetic Ring | S7F17.1 | 85000 |
| 34 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Tricuspid Valve Repair | 80,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Repair Without Prosthetic Ring | S7F17.1 | 85000 |
| 35 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Aortic Valve Repair | 80,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Repair Without Prosthetic Ring | S7F17.1 | 85000 |
| 36 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Ring for any Valve Repair | 30,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Valve Repair With Prosthetic Ring | S7F13.17 | 100000 |
| 37 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Mitral Valve Replacement (bi-leaflet mechanical (pyrolite carbon) valve) | 1,20,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Mitral Valve Replacement (With Valve) | S7F6.4 | 120000 |
| 38 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Mitral Valve Replacement (biological valve) | 1,25,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Mitral Valve Replacement (With Valve) | S7F6.4 | 120000 |
| 39 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Aortic Valve Replacement (biological valve) | 1,25,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Aortic Valve Replacement (With Valve) | S7F9.1 | 120000 |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 40 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Tricuspid Valve Replacement (bi-leaflet mechanical (pyrolite carbon) valve) | 1,20,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Tricuspid Valve Replacement | S7F9.2 | 120000 |
| 41 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Tricuspid Valve Replacement (biological valve) | 1,25,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Tricuspid Valve Replacement | S7F9.2 | 120000 |
| 42 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Double Valve Replacement (bi-leaflet mechanical (pyrolite carbon) valve) | 1,50,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Double Valve Replacement (With Valve) | S7F9.3 | 150000 |
| 43 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Double Valve Replacement (biological valve) | 1,55,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Double Valve Replacement (With Valve) | S7F9.3 | 150000 |
| 44 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Ross Procedure | 1,05,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Ross procedure - Intracardiac repair of complex congenital heart diseases With Special Conduits | S7F16.2 | 125000 |
| 45 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Atrial Septal Defect (ASD) | 75,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Intracardiac Repair Of ASD | S7F19.1 | 75000 |
| 46 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Ventricular Septal Defect (VSD) | 75,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Intracardiac Repair Of VSD | S7F13.15 | 75000 |
| 47 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Intracardiac repair (ICR) for Tetralogy of Fallot (TOF) | 1,00,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Total Correction Of Tetralogy Of Fallots | S7F14.3 | 95000 |
| 48 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Total Anomalous Pulmonary Venous Connection (TAPVC) | 1,05,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | TAPVC Correction | S7F13.14 | 95000 |
| 49 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Arterial Switch Operation | 1,20,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | TGA Arterial Switch | S7F13.9 | 150000 |
| 50 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Double Switch Operation | 1,20,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | TGA Arterial Switch | S7F13.9 | 150000 |
| 51 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Sennings | 1,05,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | TGA Sennings Procedure | S7F13.10 | 120000 |
| 52 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Surgery for Cardiac Tumour/ Left Atrial (LA) Myxoma/ Right Atrial (RA) Myxoma | 95,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Surgery For Intracardiac Tumours | S7F13.12 | 75000 |
| 53 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Patent Ductus Arteriosus (PDA) Closure | 30,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Surgery-PDA | S7F13.16 | 20000 |
| 54 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Coarctation Repair | 30,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Coarctation Of Aorta Repair Without Graft | S7F11.2 | 25000 |
| 55 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Coarctation Repair with interpostion graft | 38,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Coarctation Of Aorta Repair With Graft | S7F11.1 | 32000 |
| 56 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Pericardiectomy | 30,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Percardectomy | S7F10.1 | 30000 |
| 57 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Lung Cyst | 45,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Lung Cyst | S7F18.4 | 50000 |
| 58 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Space-Occupying Lesion (SOL) mediastinum | 45,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | SOL Mediastinum | S7F18.5 | 50000 |
| 59 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Surgical Correction of Bronchopleural Fistula | 50,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Thorocoplasty | S7F19.2 | 50000 |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 60 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Diaphragmatic Eventeration | 40,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Diaphragmatic Eventeration | S7F20.1 | 40000 |
| 61 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Oesophageal Diverticula /Achalasia Cardia | 35,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Oesophageal Diverticula /Achlasia Cardia | S7F20.3 | 40000 |
| 62 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Foreign Body Removal with scope | 20,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Bronchial Foreign Body Removal With Scope | S7F22.1 | 20000 |
| 63 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Bronchial Repair Surgery for Injuries due to FB | 35,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Bronchial Injuries Due To Foreign Body Repair Surgery | S7F22.2 | 40000 |
| 64 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Intercostal Drainage and Management of ICD, Intercostal Block, Antibiotics & Physiotherapy | 10,000 | Surgical Oncology | Intercostal Drainage(ICD) | S11J29.8 | 3000 |
| 65 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Encysted Empyema/Pleural Effusion - Tubercular | 10,000 | Paediatric Medical Management | Acute Broncho/ Lobarpneumonia With Empyema/ Pleural Effusion | M6S10.1 | 20000 |
| 66 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Pulmonary artero venous malformation | 40,000 | Intervenstional Radiology | Embolization Of Pulmonary AV Malformation Post Procedure Evidence Of Clinical Photograph And Radiographic Image | M15W1.27 | 100000 |
| 67 | **Cardiac And Cardiothoracic Surgery** | **Intrathoracic Aneurysm-Aneurysm not Requiring Bypass Techniques** | **90,000** | **Cardiac And Cardiothoracic Surgery** | Intrathoracic Aneurysm-Aneurysm Not Requiring Bypass (With Graft) | S7F11.4 | 65000 |
| 68 | **Cardiac And Cardiothoracic Surgery** | **Intrathoracic Aneurysm-Requiring Bypass Techniques** | **1,25,000** | **Cardiac And Cardiothoracic Surgery** | Intrathoracic Aneurysm-Aneurysm Requiring Bypass (With Graft) | S7F11.5 | 125000 |
| 69 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Surgery for Arterial Aneurysm Renal Artery | 40,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Small Arterial Aneurysms - Repair | S7F9.7 | 15000 |
| 70 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Aorto Bi lliac / Bi femoral /Axillo bi femoral bypass withSynthetic Graft | 90,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Aorto Billac - Bifemoral Bypass With Synthetic Graft | S7F9.10 | 125000 |
| 71 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Femoro Distal / Femoral - Femoral / Femoral infra popliteal Bypass with Vein Graft | 50,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Femorodistal Bypass With Vein Graft | S7F9.12 | 60000 |
| 72 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Femoro Distal / Femoral - Femoral / Femoral infra popliteal Bypass with Synthetic Graft | 70,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Femorodistal Bypass With Synthetic Graft | S7F9.13 | 80000 |
| 73 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Axillo Brachial Bypass using with Synthetic Graft | 65,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Axillo Brachial Bypass Using With Synthetic Graft | S7F9.14 | 65000 |
| 74 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Brachio - Radial Bypass with Synthetic Graft | 50,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Brachioradial Bypass With Synthetic Graft | S7F9.15 | 50000 |
| 75 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Carotid artery bypass with Synthetic Graft | 60,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Carotid Artery Bypass With Synthetic Graft | S7F9.17 | 100000 |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 76 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Excision of Arterio Venous malformation - Large | 50,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Excision Of AV Malformation Large | S7F9.22 | 75000 |
| 77 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Excision of Arterio Venous malformation - Small | 30,000 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Excision Of AV Malformation Small | S7F9.18 | 40000 |
| 78 | Cardiac And Cardiothoracic Surgery | Deep Vein Thrombosis (DVT) - Inferior Vena Cava (IVC) filter | 80,000 | Interventional Radiology | Deep Venous Thrombolysis For DVT With IVC Filter | M15W1.6 | 125000 |
| 79 | Opthalmology Surgery | Corneal Grafting | 8,500 | Opthalmology Surgery | Corneal Patch Graft | S3B5.3 | 4000 |
| 80 | Opthalmology Surgery | Enucleation with Implant | 11,000 | Opthalmology Surgery | Enuleation With Orbital Implant | S3B7.4 | 20000 |
| 81 | Opthalmology Surgery | Exenteration | 15,000 | Surgical Oncology | Orbital Exenteration | S11J2.1 | 25000 |
| 82 | Opthalmology Surgery | Intraocular Foreign Body Removal from Posterior Segment | 20,000 | Opthalmology Surgery | Vitrectomy | S3B6.1 | 6000 |
| 83 | Opthalmology Surgery | Lensectomy /pediatric lens aspiration | 9,000 | Opthalmology Surgery | Pediatric Cataract Surgery - Phacoemulsification – IOL | S3B10.2 | 15000 |
| 84 | Opthalmology Surgery | Ptosis Surgery | 25,000 | Plastic Surgery | Ptosis | S12M1.10 | 25000 |
| 85 | Opthalmology Surgery | Retinal Detachment Surgery | 15,000 | Opthalmology Surgery | Scleral Buckle For Retinal Detachment | S3B11.1<br>S3B6.4 | 15000<br>30000 |
| 86 | Opthalmology Surgery | Small Tumour of Lid – Excision + Lid Reconstruction | 10,000 | Opthalmology Surgery | Lid Reconstruction Surgery | S3B9.1 | 15000 |
| 87 | Opthalmology Surgery | Socket Reconstruction with amniotic membrane | 8,000 | Opthalmology Surgery | Socket Reconstruction | S3B7.1 | 7000 |
| 88 | Opthalmology Surgery | Vitrectomy | 7,500 | Opthalmology Surgery | Vitrectomy | S3B6.1 | 6000 |
| 89 | Opthalmology Surgery | Vitrectomy + Retinal Detachment surgery (pre-auth required) | 17,500 | Opthalmology Surgery | Vitrectomy - Membrane Peeling Endolaser , Silicon Oil Or Gas | S3B6.4 | 30000 |
| 90 | Opthalmology Surgery | Laser for retinopathy (per sitting) | 1,500 | Opthalmology Surgery | Photocoagulation For Diabetic Retinopathy Per Sitting | S3B11.2 | 1500 |
| 91 | Opthalmology Surgery | Lid tear | 5,000 | Opthalmology Surgery | Lid Reconstruction Surgery | S3B9.1 | 15000 |
| 92 | Opthalmology Surgery | Orbitotomy | 10,000 | Opthalmology Surgery | Orbitotomy | S3B7.3 | 10000 |
| 93 | Opthalmology Surgery | Squint correction (per muscle) | 4,000 | Opthalmology Surgery | Rectus Muscle Surgery Single. | S3B8.1<br>S3B8.2<br>S3B8.3 | 6000 |
| 94 | Opthalmology Surgery | PRP - Retinal Laser including 3 sittings | 5,000 | Opthalmology Surgery | Photocoagulation For Diabetic Retinopathy Per Sitting | S3B11.2 | 1500 |
| 95 | **ENT Surgery** | **Labyrinthectomy** | **20,000** | **ENT Surgery** | Labyrinthectomy | S2B1.1 | 20000 |
| 96 | ENT Surgery | Mastoidectomy | 12,500 | **ENT Surgery** | Mastoidectomy | S2B3.2 | 15000 |
| 97 | ENT Surgery | Stapedectomy | 10,000 | **ENT Surgery** | Stapedectomy + Veingraft | S2B3.4 | 15000 |
| 98 | ENT Surgery | Tympanoplasty | 9,000 | **ENT Surgery** | Tympanoplasty | S2B3.3 | 15000 |
| 99 | ENT Surgery | Pharyngectomy and reconstruction | 15,000 | **ENT Surgery** | **Excision Of Tumours In Pharynx** | S2B2.4 | 20000 |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 100 | ENT Surgery | Fracture - setting maxilla | 8,000 | Polytrauma | Facial Bone Fractures (Faciomaxillary Injuries) | S14O11.5 | 15000 |
| 101 | ENT Surgery | Functional Endoscopic Sinus (FESS) | 11,000 | **ENT Surgery** | Endoscopic Sinus Surgery | S2B3.1 | 15000 |
| 102 | ENT Surgery | Angiofibroma Excision | 18,000 | **ENT Surgery** | Angiofibroma Nose | S2B3.6 | 40000 |
| 103 | ENT Surgery | Cranio-facial resection | 22,500 | Surgical Oncology | Cranio Facial Resection | S11J2.4 | 70000 |
| 104 | ENT Surgery | Endoscopic DCR | 7,000 | **ENT Surgery** | Endoscopic DCR | S2B3.7 | 20000 |
| 105 | ENT Surgery | Adenoidectomy | 5,000 | **ENT Surgery** | Adenoidectomy - Gromet Insertion | S2B2.6 | 10000 |
| 106 | ENT Surgery | Laryngectomy with block dissection | 25,000 | Surgical Oncology | Laryngectomy Any Type | S11J1.8 | 40000 |
| 107 | ENT Surgery | Laryngofissure | 5,000 | **ENT Surgery** | Laryngo Fissurectomy | S2B2.3 | 20000 |
| 108 | ENT Surgery | Thyroglossal Fistula/ cyst – Excision | 7,000 | General Surgery | Excision Of Thyroglossal Cyst Fistula | S1A1.19 | 15000 |
| 109 | ENT Surgery | Total Parotidectomy | 18,000 | Surgical Oncology | Parotidectomy Any Type | S11J1.7 | 20000 |
| 110 | ENT Surgery | Uvulophanyngo Plasty | 14,000 | ENT Surgery | Uvulo-Palato Pharyngoplasty | S2B2.7 | 25000 |
| 111 | ENT Surgery | Excision of Branchial Cyst | 7,000 | General Surgery | Excision of Branchial Cyst Excision | S1A1.1 | 20000 |
| 112 | ENT Surgery | Excision of Branchial Sinus | 7,000 | General Surgery | Branchial Sinus Excision | S1A1.5 | 20000 |
| 113 | ENT Surgery | Excision of Cystic Hygroma Major/ Extensive | 10,000 | General Surgery | Cystic Hygroma Excision-Major, Cystic Hygroma Excision-Extensive | S1A1.15 | 20000 |
| 114 | ENT Surgery | Excision of Cystic Hygroma Minor | 5,000 | General Surgery | Cystic Hygroma Excision-Minor | S1A1.16 | 10000 |
| 115 | ENT Surgery | Excision of the Mandible Segmental | 7,500 | General Surgery | Segmental Mandible Excision | S1A1.7 | 25000 |
| 116 | ENT Surgery | Hemi-mandibulectomy with graft | 15,000 | General Surgery | Hemimandibulecto my | S1A1.6 | 25000 |
| 117 | ENT Surgery | Hemiglossectomy | 6,000 | Surgical Oncology | Hemiglossectomy | S11J1.4 | 15000 |
| 118 | **ENT Surgery** | **Palatopharyngoplasty** | **10,000** | **ENT Surgery** | Uvulo-Palato Pharyngoplasty | S2B2.7 | 25000 |
| 119 | ENT Surgery | Partial Glossectomy | 5,000 | General Surgery | Partial Glossectomy | S1A1.9 | 15000 |
| 120 | ENT Surgery | Removal of Submandibular Salivary gland | 5,000 | General Surgery | Removal Of Submandibular Salivary Gland | S1A1.3 | 10000 |
| 121 | ENT Surgery | Total Glossectomy | 15,000 | Surgical Oncology | Total Glossectomy + Reconstruction | S11J37.3 | 40000 |
| 122 | Orthopaedics | Amputation - one or more toes/ digits | 6,000 | Polytrauma | Amputation Surgery | S14O1.2 | 5000 |
| 123 | Orthopaedics | Anterior Spine Fixation | 35,000 | Orthopaedics | Spinal Ostectomy And Internal Fixations | S5D2.12 | 40000 |
| 124 | Orthopaedics | Arthrodesis Ankle Triple | 15,000 | Orthopaedics | Arthrodesis Of - Major Joints | S5D2.4 | 30000 |
| 125 | Orthopaedics | Bone Tumour Excision + reconstruction using implant (malignant/ benign) | 50,000 | Orthopaedics | Excision Of Bone Tumours. Deep With Re-Construction With Conventional Prosthesis | S5D6.1 | 40000 |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 126 | Orthopaedics | Bone Tumour (malignant/ benign) curettage and bone grafting | 20,000 | Surgical Oncology | Wide Excision soft tissue/Bone Tumours, Bone Grafting As Exclusive Procedure | S11J34.1 | 15000 |
| 127 | Orthopaedics | Fracture - Acetabulum | 30,000 | Polytrauma | Surgical Correction Of Pelvic Bone Fractures. | S14O11.6 | 20000 |
| 128 | Orthopaedics | Fracture - Fibula Internal Fixation | 10,000 | Polytrauma | Open Reduction And Internal Fixation Of Long Bone Fractures | S14O1.1 | 15000 |
| 129 | Orthopaedics | Fracture - Hip Internal Fixation (Intertrochanteric Fracture with implant) + rehabilitation | 17,000 | Polytrauma | Open Reduction And Internal Fixation Of Long BoneFractures | S14O1.1 | 15000 |
| 130 | Orthopaedics | Fracture - Humerus Internal Fixation | 17,000 | Polytrauma | Open Reduction And Internal Fixation Of Long Bone Fractures | S14O1.1 | 15000 |
| 131 | Orthopaedics | Fracture - Olecranon of Ulna | 10,000 | Polytrauma | Open Reduction And Internal Fixation Of Long Bone Fractures | S14O1.1 | 15000 |
| 132 | Orthopaedics | Fracture - Radius Internal Fixation | 10,000 | Polytrauma | Open Reduction And Internal Fixation Of Long Bone Fractures | S14O1.1 | 15000 |
| 133 | Orthopaedics | Fracture - TIBIA Internal Fixation plating | 17,000 | Polytrauma | Open Reduction And Internal Fixation Of Long Bone Fractures | S14O1.1 | 15000 |
| 134 | Orthopaedics | Fracture - Ulna Internal Fixation | 10,000 | Polytrauma | Open Reduction And Internal Fixation Of Long Bone Fractures | S14O1.1 | 15000 |
| 135 | Orthopaedics | Head Radius – Excision | 8,000 | Polytrauma | Open Reduction And Internal Fixation Of Long Bone Fractures | S14O1.1 | 15000 |
| 136 | Orthopaedics | High Tibial Osteotomy | 17,000 | Orthopaedics | Soft Tissue Reconstruction Procedures For Joints/Osteotomy | S5D2.9 | 30000 |
| 137 | Orthopaedics | Internal Fixation Lateral Epicondyle | 10,000 | Polytrauma | Open Reduction And Internal Fixation Of Long Bone Fractures | S14O1.1 | 15000 |
| 138 | Orthopaedics | Internal Fixation of other Small Bones (metatarsals) | 10,000 | Polytrauma | Small Bone Fractures K-Wiring (To Be Covered With Other Injuries Only And Not As Exclusive Procedure) | S14O11.4 | 5000 |
| 139 | Orthopaedics | Llizarov Fixation | 10,000 | Orthopaedics | Ilizarov Ring Fixator Application. | S5D1.5 | 40000 |
| 140 | Orthopaedics | Nerve Transposition/Release/ Neurolysis | 8,000 | Orthopaedics | Neurolysis/Nerve Suture | S5D2.14 | 25000 |
| 141 | Orthopaedics | Open Reduction Internal Fixation (Large Bone) | 20,000 | Polytrauma | Open Reduction And Internal Fixation Of Long Bone Fractures | S14O1.1 | 15000 |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 142 | Orthopaedics | Reconstruction of ACL/PCL with implant and brace | 30,000 | Orthopaedics | Arthroscopy - ACL Repair | S5D2.7 | 30000 |
| 143 | Orthopaedics | Arthroscopic Meniscus Repair/ Meniscectomy | 20,000 | Orthopaedics | Arthroscopy. Operative Meniscectomy | S5D2.6 | 25000 |
| 144 | Orthopaedics | Arthrodesis of shoulder | 40,000 | Orthopaedics | Arthrodesis Of - Major Joints | S5D2.4 | 30000 |
| 145 | Orthopaedics | Arthrodesis of Knee (with implant) | 40,000 | Orthopaedics | Arthrodesis Of - Major Joints | S5D2.4 | 30000 |
| 146 | Orthopaedics | Arthrodesis of Wrist (with implant) | 30,000 | Orthopaedics | Arthrodesis Of - Major Joints | S5D2.4 | 30000 |
| 147 | Orthopaedics | Arthrodesis of Ankle (with implant) | 30,000 | Orthopaedics | Arthrodesis Of - Major Joints | S5D2.4 | 30000 |
| 148 | Polytrauma | Nerve Plexus injuries, Tendon injury repair/reconstruction/ Transfer | 50,000 | Plastic Surgery | Nerve And Tendon Repair + Vascular Repair | S12M1.9 | 30000 |
| 149 | Polytrauma | Internal fixation with Flap cover Surgery for wound in compound fracture | 40,000 | Polytrauma | Flap Cover Surgery For Wound In Compound Fracture | S14O11.2 | 20000 |
| 150 | Polytrauma | Head injury requiring Facio-Maxillary Injury repairs & fixations(including implants) | 35,000 | Polytrauma | Facial Bone Fractures (Faciomaxillary Injuries) | S14O11.5 | 15000 |
| 151 | Polytrauma | Internal fixation of Pelviacetabular fracture | 40,000 | Polytrauma | Surgical Correction Of Pelvic Bone Fractures. | S14O11.6 | 20000 |
| 152 | Polytrauma | Emergency tendons repair ± Peripheral Nerve repair/ reconstructive surgery | 30,000 | Orthopaedics | Soft Tissue Reconstruction Procedures For Joints/Osteotomy | S5D2.9 | 30000 |
| 153 | Urology | Adrenalectomy-unilateral, open | 25,000 | Surgical Oncology | Adrenalectomy | S11J24.2 | 45000 |
| 154 | Urology | Adrenalectomy-bilateral, open | 32,000 | Surgical Oncology | Adrenalectomy | S11J24.2 | 45000 |
| 155 | Urology | Nephrectomy (Benign) Open | 25,000 | Genitourinary System | Simple Nephrectomy | S9H7.3 | 40000 |
| 156 | Urology | Nephrectomy (Benign) Laparoscopic | 30,000 | Genitourinary System | Lap. Nephrectomy Simple | S9H7.4 | 30000 |
| 157 | Urology | Nephrectomy-Radical (Renal tumor) Open | 25,000 | Surgical Oncology | Radical Nephrectomy | S11J23.3 | 40000 |
| 158 | Urology | Nephrectomy-Radical (Renal tumor) Laparoscopic | 30,000 | Genitourinary System | Lap. Nephrectomy Radical | S9H7.5 | 40000 |
| 159 | Urology | Nephrectomy-Partial or Hemi, Open | 30,000 | Surgical Oncology | Partial Nephrectomy | S11J23.1 | 55000 |
| 160 | Urology | Nephrectomy-Partial or Hemi, Laparoscopic | 35,000 | Genitourinary System | Lap. Partial Nephrectomy | S9H7.6 | 35000 |
| 161 | Urology | Nephro ureterectomy (Benign) Open | 25,000 | Genitourinary System | Bilateral Nephroureterectomy | S9H7.7 | 25000 |
| 162 | Urology | Nephro ureterectomy (Benign) Laparoscopic | 30,000 | Genitourinary System | Bilateral Nephroureterectom y | S9H7.7 | 25000 |
| 163 | Urology | PCNL (Percutaneous Nephrolithotomy) - Bilateral | 40,000 | Genitourinary System | PCNL | S9H4.2 | 30000 |
| 164 | Urology | PCNL (Percutaneous Nephrolithotomy) - Unilateral | 25,000 | Genitourinary System | PCNL | S9H4.2 | 30000 |

